**सप्टेंबर-ऑक्टोबर, २०२२ मध्ये राज्यातील विविध जिल्ह्यात अतिवृष्टीमुळे तसेच उद्भवलेल्या पूरपरिस्थितीमुळे झालेल्या नुकसानीसाठी बाधित शेतकऱ्यांना वाढीव दराने मदत देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२२/प्र.क्र.२९७/म-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२३.

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग समक्रमांक दि.दि.१५.१२.२०२२
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६७/म-११,दि.२४.०१.२०२३.
३) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.२०२३/म.शा./कार्या-४/नै.आ./जिनिक/प्र.क्र.१९/आर. आर-४४६, दि.२०.०३.२०२३.

<u>शासन निर्णय</u>:

वर नमूद दि. १५.१२.२०२२ शासन निर्णयान्वये सप्टेंबर-ऑक्टोबर,२०२२ या कालावधीत राज्यात झालेल्या अतिवृष्टीमुळे व पूर परिस्थितीमुळे शेतीपिकांच्या बाधितांना मदत देण्याकरिता राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधून सोलापूर जिल्हयातील शेतीपिकांच्या व शेतजमिनीच्या नुकसानीसाठी एकूण **रु.४६१.९० लक्ष** इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात आली आहे. विभागीय आयुक्त, पुणे यांनी वर नमूद दि. २०.०३.२०२३ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन सोलापूर जिल्हयाकरिता **रु.४६१.९० लक्ष** ऐवजी **रु. ५९२.३९ लक्ष** (रुपये पाच कोटी ब्यान्नव लक्ष एकोणचाळीस हजार फक्त) इतका निधी विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि. २४.०१.२०२३ अन्वये शेती पिकांच्या नुकसानीकरिता दिला जाणारा निधी बीडीएस प्रणालीवर वितरीत न करता केंद्रीभूत पध्दतीने थेट लाभार्थी हस्तांतरण पध्दतीनुसार वितरीत करण्यात येत आहे. त्यामुळे बीडीएस वर शिल्लक असलेला निधी उपयोगात आणता येणार नाही. यास्तव, जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी त्यांच्याकडे लेखाशिर्ष २२४५ २४५२ व २२४५२३०९ या अंतर्गत बीडीएस वर असलेली संपूर्ण रक्कम तातडीने समर्पित करावी.

३. निधी वितरण करण्याकरिता लेखाशिर्षनिहाय सुधारीत प्रपत्र या शासन निर्णयासोबत जोडले आहे. त्या प्रपत्रात लेखाशीर्षनिहाय दर्शविल्याप्रमाणे कार्यासन म-११ यांनी हा निधी वितरित करावा.

४. वरील प्रयोजनासाठी प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी अंतर्गत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली उपलब्ध निधीमधून खर्च करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र.२०२३०३२९१८४३१३८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2023.03.31 13:37:57 +05'30'

**(संजय औ. धारूरकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई
३. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
४. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
५. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
६. विभागीय आयुक्त, पुणे
७. जिल्हाधिकारी,सोलापूर.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
९. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१०. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१५. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )

शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.२९७/म-३, दि. २९ मार्च, २०२३ सोबतचे प्रपत्र

**सप्टेंबर व ऑक्टोबर, २०२२ मध्ये शेतीपिकांच्या व शेत जमिनीच्या झालेल्या नुकसानीकरिता वितरित करावयाचा सुधारित लेखाशिर्षनिहाय तपशिल**

| अ. क्र. | जिल्हा | शेतकरी संख्या | शेतीपिकांचे बाधित क्षेत्र (२ हे.पर्यंत) | निधी | | शेतीपिकांचे बाधित क्षेत्र (२ हे. ते ३ हे.) | निधी | एकुण | | एकुण शेतीपिकांच्या नुकसानीकरिता वितरित निधी (२२४५ २४५२+२२४५ २३०९) (रु.लाखात) | शेत जमिनीचे बाधित क्षेत्र | वितरित निधी (२२४५ ०२९१) (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | २२४५ २४५२ | २२४५ २३०९ | | २२४५ २३०९ | शेतीपिकांचे बाधित क्षेत्र | निधी (२२४५ २३०९) (रु.लाखात) | | | |
| १ | सोलापूर | ३५५८ | ३६९७.९० | २१२.७६ | ३७९.६३ | ०.०० | ०.०० | ३६९७.९० | ३७९.६३ | ५९२.३९ | ०.०० | ०.०० |
| **एकण पुणे** | | ३५५८ | ३६९७.९० | २१२.७६ | ३७९.६३ | **०.००** | **०.००** | ३६९७.९० | ३७९.६३ | ५९२.३९ | ०.०० | ०.०० |